**मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतुदीनुसार एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी जमा रक्कमेमधून मुंबई मेट्रो रेल्वे व पुणे मेट्रो रेल्वे या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पांच्या अंमलबजावणी संस्थांना निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२४/प्र.क्र.२११/नवि-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २५ मार्च, २०२५.

**वाचा :**

१. महाराष्ट्र शासन राजपत्र अधिसूचना असाधारण क्र. ५६ दि. २१.०८.२०१५.
२. महाराष्ट्र शासन राजपत्र भाग एक-अ नागपूर विभागीय पुरवणी अधिसूचना दि.३०.०६.२०१६.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३१९/प्र.क्र.६१/नवि-७, दिनांक १० सप्टेंबर, २०२०.
४. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२२/प्र.क्र.१७३/नवि-७, दि.०८.१२.२०२३, २०.०२.२०२३, दि.२८.०३.२०२३, दि. २८.०७.२०२३.
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०, अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३.
६. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२३/प्र.क्र.९०(भाग-२)/नवि-७, दि. १५.०३.२०२४.
७. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२४/प्र.क्र.७६/नवि-७, दि. २०.०६.२०२४, १९.०९.२०२४, २४.१२.२०२४
८. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२४/प्र.क्र.६३/नवि-७, दि. २७.११.२०२४.
९. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक- एमआरडी-३३२४/प्र.क्र.२११/नवि-७, दि.१०.०२.२०२५

**प्रस्तावना :-**

मुंबई महानगरपालिका अधिनियम-१८८८ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम-१९४९ मधील तरतुदीनुसार राज्यामध्ये राबविण्यात येत असलेल्या महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पांशी संबंधित महानगरपालिका क्षेत्रात स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, दान व फलोपभोग गहाण या संबंधीच्या संलेखांवर मुद्रांक शुल्क अधिनियमान्वये आकारावयाच्या मुद्रांक शुल्कात एक टक्का दराने अधिभार आकारुन वाढ करणे व सदर अधिभारापोटी वसुल केलेल्या रक्कमेएवढे सहायक अनुदान अशा प्रकाराचे प्रकल्प हाती घेतलेल्या अभिकरणाला/प्रकल्प अंमलबजावणी संस्थेला प्रदान करण्याबाबत तरतूद करण्यात आली आहे.

एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी वसूल करण्यात आलेल्या रक्कमेमधून महत्वाकांक्षी नागरी परिवहन प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन यांना सन २०२४-२५ मध्ये मंजूर तरतुदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

१. एक टक्का अतिरिक्त मुद्रांक शुल्क अधिभारापोटी सन २०२४-२५ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खालील **विवरणपत्र-अ** मध्ये दर्शविल्याप्रमाणे **मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (एमएमआरसीएल), महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन (महामेट्रो) व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण (एमएमआरडीए) यांना एकूण रु.६५८,७९,००,००० कोटी (अक्षरी सहाशे अठ्ठावन्न कोटी एकोणऐंशी लाख फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

विवरणपत्र अ

सन २०२४-२५ मध्ये वितरीत करावयाचे अनुदान

| अ. क्र. | लेखाशीर्षाचा तपशील | वितरीत करावयाचा निधी (रु. कोटी मध्ये) | निधी वितरीत करावयाच्या संस्थेचे नाव |
|---|---|---|---|
| मागणी क्रमांक एफ-५, ४२१७-नगर विकासावरील भांडवली खर्च, ६०- नगर विकास विभाग इतर योजना, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका | | | |
| १. | (०२) (०१) राज्यातील महत्वाकांक्षी अधिसूचित प्रकल्पांना मुद्रांक शुल्क अधिभाराचे प्रदान (अनिवार्य), ५४-गुंतवणुका, **(संकेतांक- ४२१७०८७३)** | १६८.०० | **महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. (महामेट्रो), पुणे** |
| | | १८१.३० | **मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मुंबई** |
| | | ३०९.४९ | **मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई** |
| | **एकूण** | ६५८.७९ | - |

२. उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव, नवि-५ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी. आहरण व संवितरण अधिकारी यांनी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यास मंजुरी प्राप्त रक्कम रू.६५८.७९.०० कोटी रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून आहरीत करून ती उपरोक्त विवरणपत्र-अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे महाराष्ट्र मेट्रो रेल कार्पोरेशन लि., मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि. व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्याकडे वर्ग करावी.

३. राज्य शासनाकडून प्राप्त होणाऱ्या सदर रक्कमांसाठी **मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लि., मुंबई; मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई व महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, पुणे/नागपूर** यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावेत.

४. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर निधीसाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अनुदान विषयीच्या इतर संबंधीत अटी व शर्ती लागू राहतील.

५. मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई व महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, पुणे/नागपूर यांना वितरीत करण्यात येणारी रक्कम ही केवळ प्रकल्पासाठी बाह्य सहाय्यित संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यासाठी वितरीत करण्यात येत आहे. बाह्य सहाय्यित संस्थेला कर्जाची परतफेड केल्याचा तपशील शासनास सादर करावा.

६. तसेच मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणास देखील सदर रक्कम प्रामुख्याने कर्ज व व्याज परतफेडीसाठी वितरीत करण्यात येत आहे.

७. सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाचा अनौ. संदर्भ ९१/व्यय-३, दि.२०/०३/२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२५१८३०३५९७२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2025.03.25 18:32:04 +05'30'

**(विजय चौधरी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.
३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन, मुंबई
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र मेट्रो रेल कॉर्पोरेशन, पुणे/नागपूर
६. महालेखापाल- १ व २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. सह सचिव, (अर्थसंकल्प-१६), (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सह सचिव, न.वि.-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. कक्ष अधिकारी नवि-४, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. लेखाधिकारी, नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. रोख शाखा (३ प्रती)
१५. निवड नस्ती, नवि-७.